पुरुषोत्तम शिवराम रेगे

# दोला

१९५०

सदानन्द प्रकाशन,

पणजी गोवें

**या** संग्रहांत गेल्या दहा वर्षांतील मला ज्या एकत्रित करावयाशा वाटल्या अशा कवितांचा समावेश केलेला आहे. त्यांपैकीं बहुतेक सर्व सत्यकथा, साहित्य, युगवाणी आणि अभिरुचि यांत प्रसिद्ध होऊन गेल्या आहेत.

पुस्तक प्रकाशनाचे बाबतींत श्री. दत्ताराम वामन नाईक यांनी हौशीने पुढाकार घेतला आणि माझे कवि-मित्र श्री. शंकर रामाणी यांनी मुद्रितें वगैरे तपासून दिलीं याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. चित्रकार श्री. दीनानाथ दलाल यांनी मुखपृष्ठावरील रेखन माझ्या कल्पनेप्रमाणें आणि अगदीं थोड्या अवधींत तयार करून दिल्याबद्दल त्यांचेहि आभार मानायला हवे.

**पुरुषोत्तम शिवराम रेगे**

१४ हावें रोड,
मुंबई ७
५ मे १९५०

# क्रम

# काव्य

अशिक्षितपटू भलतिच तूं
ज्ञातास्वादहि मी . . .
कविकुलगुरुचें काव्य असें
कधिकधि ये कामी !

## मुग्धा

कालचीच तूं आजहि मुग्धे,

लपविसि कांही कां मग इतुके ?

कालचेच ते उरोज आजहि

असतिल नसतिल लिंबाइतुके.

# तूं हंसतांना

खळखळुन तशी तीं हंसतांना
वाटेंत रांगडी दिसलिस तूं ;
आणि वाटलें अधीर अधुऱ्या
काळाचाही चळला हेतू.

क्षणभर माझा मीच न उरलों ;
हलकें सारें जगही झालें ;
तुझ्याभोंवतीं गिरकी घेउन
माझ्यापाशीं अन् आदळलें.

दुरून आलों, आहे पुन्हा
दूर श्यामले, मला जायचें ;
कधी तरी पण तुझ्याच संगें
खळखळुन तसे तें हंसाहंसायचें.

## अजाण

किती तरी सांगायचें
    आहे माझ्या मनांतून :
आणि तूं ही एवढीशी
    चिट कोवळी ... अजाण !

# डोळ्यांतिल ती . . .

डोळ्यांतिल ती चाल निराळी
स्वप्नें जेथे गडबडली ;
ओठांवरची झांक निराळी
स्वप्नें जेथे मोहरली ;

वक्षावरची उघड धिटाई
स्वप्नें जेथे अवघडली ;
अन् ती निथळी छुपी कमाई
स्वप्नें जेथे शहारली . . .

स्वप्नांत तुझ्या स्वप्नें माझीं
स्वप्नांत कधी जीं फसलीं,
आज अशीं हीं तुझ्यांत पुन्हा
रसरसलेलीं मज दिसलीं.

# चुकुर

डोकावले देतांना तूं
बाळे आळोखेपिळोखे
डाव्या बाहींतून दोन
कुणी चुकुर नवखे.

# डोळ्यांत तुझ्या . . .

डोळ्यांत तुझ्या स्वच्छ हवा
अर्थ न कळला ज्यांस नवा . . .
कळून किंवा जो पुरता
कांहि निराळा तुजपुरता.

ओठांत तुझ्या स्वच्छ झरा
हेतु न कळला ज्यांस खरा . . .
कळून किंवा जो पुरता
कांहि निराळा तुजपुरता.

डोळ्यांत तुझ्या स्वच्छ हवा.
गुदमरुनी पण मी जातो:
ओठांत तुझ्या स्वच्छ झरा
कासाविस अन् मी होतो.

## कृतकप्रौढा

प्रौढेचा तर थाट हुबेहुब . . .
कसें म्हणूं अनभिज्ञहि तूं ?
स्तनांखालची धूसर रेषा
वठविलीसही बिनचुक तूं !

## कांटा

पहिल्याच त्या धगीचा
गालांवर जो बोभाटा
काय आटलें आगींत
कसा झडला ग कांटा ?

# छटेल

मुल्खाची तूं छटेल म्हणती
उमर तुझी तर पंध्रासोळा :
चालहि गरती टापटिपीची
डोळ्याला ना भिडविसि डोळा.

आम्ही दूर देशचे पंडित गुणवंत
ऐकुन चरित तुझें अडलों या नगरांत ;
इथली रीतभात ना आम्हां कांहिच माहित.

भाग्य उजळलें परंतु येथे
आजुबाजुला कितीक गोळा ;
मुल्खाची तूं छटेल म्हणती
उमर तुझी तर पंध्रासोळा !

किति जपुन थांबसी वळणावर बाजूस,
पद लक्षित अन् अळुमाळच घुटमळतेस ;
क्षणभर वेल्हाळ बाळ जणुं जानकीच गमतेस.

पुन्हा पाहिला तोच मघांचा
भाव मुखावर तसाच भोळा ;
मुल्खाची तूं छटेल म्हणती
उमर तुझी तर पंध्रासोळा !

कोणा कुळवंताची कन्या दिसतेस ;
जर का ठाउक होइल कोठे असतेस,
परदेशी आम्ही येउं बाजुला वसतीस.

भररस्त्यावर बघतां बघतां
घातलासही खुशाल डोळा ;
मुल्खाची तूं छटेल म्हणती
उमर तुझी तर पंध्रासोळा !

## फुल्छडी

म्हणतात कुणी गे जहरी नागिण तूं ;
करितेस डंखही नसतांना हेतू.
म्हणतात कुणी नाजूक फुल्छडी तूं ;
अन् वसंतहि तुझा फुलतो साहि ऋतू.

# चोरुन

चोरुन गर्दित तुला पाहतां
धिटाइने तूं दृष्टि भिडविसी ;
धिटाइने मी जरा पाहतां
गांवचीच त्या नाहि दाविसी.
नसतांना मी घरांत येउन
वित्तंबतामि घेउन जासी ;
असतांना मी थाऱ्यालाही
मुळी न माझ्या उभी राहसी.
कंटाळा तर इतुका करिसी
नांव ऐकतां उठून जासी ;
टिपणवह्यांवर, पुस्तकांत पण
नवीन आद्याक्षरें जुळविसी.
अजून नाही झालिस माझी
ओळख पण तूं जुनी दाविसी ;
अजून नाही झालिस माझी
नातें पण तूं जुनें सांगसी.

## संकेत

सुमद्रामहि पूर्वी जातच नव्हता जेथे
तूं फौंटन पेनहि सहज लपविसी तेथे.
संकेत पूर्वीचे . . . तें कलापूर्ण जीवन . . .
काळाचा महिमा जाणवतो आतां पण !

# मिजास

विनदिक्कत जासी चिखलांतुन अन्
पायांत पांढरे बूट . . .
गे, मिजास पाहुन तुझी कुणाला
उगाच लागे चुटपूट.

## सांठेबाज

लाल तुझा अंगवठा
    लाल तुझ्या अंगीं ताठा ;
लाल रक्ताच्या पेशींचा
    किती केलास ग सांठा ?

# थोरवी

तुझ्या उभार वक्षाची

नेहमीची ती थोरवी

नाही पटतच होतां

शेजेवर तूं आडवी.

# तुझेच डोळे

तुझेच डोळे . . .

जेथे कातर नवतीच्या अश्राप खुणा

तुझेच डोळे

अखेर ठरले जिवघेणे भिरभिरतांना.

## डोळे मोडीत . . .

डोळे मोडीत चालसी ;

उभा गांव चालविसी . . .

मागें वळून पाहसी ;

उभा गांव चाळविसी.

# उजाडलें

उजाडलें मघांशीच
कसे उठवूं ग तुला ?
आतांशीच तर कुठे
तुझा डोळा हा लागला.

# विरक्ति

जरा बोलावितां, कामें
राहिलेलीं आठविसी ;
साधें पाहतांच दृष्टि
शिताफीनें फिरविसी.

तेंच मोजकेंच शब्द
विनवितां ऐकविसी ;
सारें समजून पुन्हा
वर वेड पांघरिसी . . .

आणि संभावितपणें
झोंपसीहि पाठमोरी.
अलिकडे आंगालाहि
हात लावायची चोरी.

नेहमीच्याच गोष्टींचा
असा करिसी कंटाळा.
विरक्तीची ही कुठून
आली लहर गे तुला ?

# शरमिंधा

प्रतिपदेचा हा चंद्र
आला शरमिंधा लाल.
रातभर वरसून
पुरा थकला ग काल.

# कितव

उगाच व्याकुळ झालों पाहुन

घोटिव शिसवी पूर्ण स्तन तव . . .

ठाउक नव्हतें तसाच होता

आंतहि कोणी निर्लेप कितव.

## आणि म्हणूनच . . .

रूप तुला तर मुळीच नाही ;
नाहि चातुरी, भूलभुलाई.
आणि म्हणूनच मिठींत तूझ्या
नागवीच ही मस्ती कांही !

## कमळण

[ छंद : गद्योच्चारी ]

आळसावलेले डोळे
उगाच केलेस मोठे.
त्यांत जाइन मावून मी
वाटलं का ग, पोरटे ?

ओठ टेकले पापणीवर
म्हणून, का हा इंगा ?
कमळण ऐसी दर्दी
अटकवलाही भुंगा !

रागोबाचे डोळे . . .
ओहो केवढे मोठे !
त्यांत असाच मावून मी
राहिन का ग, चोरटे ?

# सडक मोकळे काळे केस

सडक मोकळे काळे केस
उन्हांत चोपुन वाळवितेस.

परतुन अंगावरती तेच
खुपसावे मुख त्यांत तसेंच
. . . सावकाश हुडकावे पेच . . .
मनांतलें का समजुन हेंच

मान झटकुनी वेळवितेस ?

## उनाड हा वारा

आंगाबरोबर आहे
तुझी नेसण्याची तऱ्हा ;
भर उन्हाची चालसी
किती घामाच्या या धारा !

आणि मधेंच थांबून
निऱ्या चाळविसी जरा,
पुटपुटत कांहीसें
'मला उनाड हा वारा !'

# उच्छादी हा वारा

कसा उच्छादी हा वारा
केळ झोडपून गेला!...
किती झांकशील मांडी
नाही मर्यादा ग ह्याला !

## लंपट ओलें वस्त्र होउनी

लंपट ओलें वस्त्र होउनी
अंग अंग तव लिंपुन घ्यावें ;
हुळहुळणारें वस्त्र रेशमी
होउन वर वर घोटाळावें.

भुइवर निखळुन नवख्यापरि तुज
दुरून रात्रीं तसें पहावें ;
पहांट होतां पश्मीन्याची
शाल होउनी तुज छपवावें.

## ते डोळे

ते डोळे, चिकचिक तोंडावरची,
हनुवटिवर ती पुळी . . .
मी पथिक घरीं . . . पण आज तिचा गे,
नाहि भरंवसा मुळीं.

## खुणा

अन् फिकट गुलाबी ढगा आडच्या
खुणा मांडिवर तिच्या नभाच्या.

# लाल नाजूक ती तशी

पिटकुळीच्या कळ्यांचीं
लालटोंक तिचीं नखें,
आबोलीच्या पाकळ्यांचे
ओठ तिचे ओले-सुके . . .

आणि तिच्या दंडावर
चमेलीची आहे-नाही,
उसवली छातीवर
सोनटक्क्याची दुलई . . .

लाल नाजूक ती तशी,
पण पुण्याईने माझ्या
गड्या, मजबूत मांड्या
तिच्या ओतीव काशाच्या !

## काहून

'काहून' तसें तें म्हटलें
तेव्हाच तिने मज पटलें,
आंगाशिंच खात्रीने हें
येईल वऱ्हाडी खटलें!

# एक तशी ती

एक तशी ती भित्री हरिणी
आली फसवुन फसवीं नातीं,
ऊन ऊन अन् जिची चुंबिलीं
कानशिलें मी जिन्याखालतीं...

आणि ती तशी संथ लुटारू
विखार हृदयीं जिच्या लोभले;
जिच्याच्यपाशीं हाय परंतू
माझें मजला कांहि मिळाले !

एक तशी समयज्ञ पुरंध्री
        नव्याजुन्याच्या सीमेवरतीं,
जून जिच्या मी ओठांवरतीं
        कांहि गोंदल्या नव्या विस्मृती . . .

आणि ती तशी पोर विचक्षण
        हट्टाने जी भलत्या वेळीं
अनाघ्रात अन् काय कुणीसें
        म्हटलें तें पटवाया सजली !

एक तशी ती, एक अशी अन् . . .
भ्रमतों पुन्हा असाच मी पण !

## किल्ले जोबन

किल्ले जोबन हा तटबंदी ;
दो बुरुजांवर दोन शिबंदी !
गनिम रोखिला जरि तिन वर्ष,
आंत फितूरी ! होइल कैसें ?

## झक तुझी रे काकू !

ती नितंबिनी
तंबिच देइल तुजला ;
ती तनुमध्या
नकोच म्हणशिल सध्यां !

ती मीनाक्षी
अक्षी पळविल पाणी ;
ती बिंबोष्ठी
नको तिच्या त्या गोष्टी !

ती मदालसा
डाळहि शिजूं न देइल ;
प्रदीर्घकामा
कैंची ये मग कामा ?

रे कोणाचें
कांहि नको तूं ऐकूं ;
ही हक्काची
झक तुझी रे, काकू !

# मालण

आढीचा आंबा पिकला काय ?
अबलख वारू तयार काय ?
जुनी फिरंगी दारू काय ?
मत्तयौवना झुलली काय ?

शेवंति पिवळी फुलली काय ?
चवळिचि शेंग कवळी काय ?
नवथर हरिणी बुझली काय ?
नाजुक पुतळी लवली काय ?

माषुक मैना . . . चंचल नयना . . .
दिला बयाणा नाहिच काय ?
मालण कोणी पाहिली काय ?
मालण माझी झुकली काय ?

# मैना बोले

मैना बोले — जिवलग हसला येइना ;
राघू बोले — आम्ही कांही मागूं.

मैना बोले — आहे एकच गहिना ;
राघू बोले — आम्ही भलतें सांगूं.

मैना बोले — ओढवली मग दैना ;
राघू बोले — आम्ही सीधे वागूं.

## सत्त्वस्थ

पहुडली जरी ही स्वस्थ
चोरून अंग सत्त्वस्थ,
बिलगेलहि लगबग . . . जळीं
उसळते जशी मासळी.

## ती नको म्हणाली

मी धीट कांहिसें गेलों बोलुन ;
ती नको म्हणाली . . . आगळेंच पाहुन
राहुन राहुन.

# कथा

तिच्या लहरी प्रेमाच्या
जर सांगेन मी कथा,
द्रवणार नाही कुणी ;
झुरतील मात्र वृथा.

# वळणावरतीं

वळणावरतीं पुढें कुणी
होतें . . . पण नाही दिसलें.
खेळाच्या धांदलींत मी
अंगावरतीं आदळलें
पडलें, चिडलें . . . गडबडलें,
शब्दहि गेला उणादुणा.
क्षणांत पण कांही झालें !

क्षणांत पण कांही झालें !
आणि वाटलें टाकावे
पिंजारुन त्याचे केस,
दूर पळावें कुठें तरी
खूप रडावें हलकेंच . . .
मलाच मी नवखी झालें !
कसें दाखवूं तोंड कुणा ?
नष्ट कशी नाही मेलें ?

## ठाउक नव्हतें

तें कांहिच्याबाहि बोलणें ;
पाहणेंहि रोखुन कसलें ;
मन माझें असलें . . . फसलें.
गे ठाउक नव्हतें तसलें !

# अवगुंठन

मी धीट वसन नव ल्यालें ;
        पण पाहतांच तूं झालें
क्षण मेल्याहुनही मेलें.

मोहरली लहरी काया ;
        गुदमरली पहिली वहिली
रे लाख फुलांची माया.

तें वसनहि फसवें फिटलें.
        अवगुंठन तव नेत्रांचें
मिरवाया नवथर नटलें.

## कोकिळे ग बाई

कोकिळे ग बाई,

गाउं नको . . . गाउं नको ;

मन माझें बेचैन.

कळीकळींतुन ऋतू बहरला ;

उघडें झालें दैन,

कोकिळे ग बाई.

कोकिळे ग बाई,

गाउं नको . . . हिणवुं नको

फसलें मी पाहून.

चतुर तुला जर कुणी भेटलें

दाखिव त्या गाऊन,

कोकिळे ग बाई.

कोकिळे ग बाई,

गाऊं नको . . . शिणवुं नको ;

मन माझें बेचैन.

कळीकळींतुन ऋतू बहरला ;

उघडें झालें दैन,

कोकिळे ग बाई.

# डोळे मोठे गिर्रेबाज

[छंद : गद्योच्चारी]

डोळे मोठे गिर्रेबाज ;
  लालचुटुक ओठ ;
कांति धुंद शराबी . . .
  जवानीचा लोट.

उधळमाधण अभावित ;
  जवानीचा काल.
दयाळा रे, पोर तशी
  नाही चवचाल.

धसमुसळी आहे खुळी
जवानीची चाल.
दयाळा रे, नको म्हणूं
पोर मस्तवाल.

भोळीभाळी आहे बाळी ;
फुकट घेइल हाय.
जवानीच्या कळा जाणे
पोरीची रे माय.

डोळे मोठे गिरेबाज ;
लालचुटुक ओठ ;
कांति धुंद शराबी . . .
जवानीचा लोट.

# पलिकडे त्या घरांत

पलिकडे त्या घरांत
आहे सायकल नवी ;
कधी अंगणांत चाले
तिची करून सफाई.

पलिकडे त्या घरांत
नवी मुद्गलाची जोडी ;
कुणी पारवा घुमतो,
सांजसकाळ दवडी.

पलिकडे त्या घरांत

खिडकीत त्या तिकडे

दिवा नेहमी जळतो

हल्लीं बाराच्याहि पुढें.

पलिकडे त्या घरांत

मित्र नवीन येतात . . .

घाबरतें मी उगाच . . .

हंसतात, खेळतात.



कुळवंताची मी पोर

कसें कुणा समजावूं?

बोरें आहेत पिकलीं

झाड कसें ग हालवूं!

# तेजोगर्भा

तापल्या सोन्यासारखी
रसरशीत ती कांति,
तिथे कशी ग फुलली
फिकी पिवळी शेवंती ?

स्वैर भिरभिरणारे
भुंग्यापरीस ते डोळे
आतां अवचित कसे
जड दीनवाणे झाले ?

तीरासारखी चपळ
कां ग धरणी न्याहाळी ?
अवखळ मुलखाची
कुठे रीत ही शिकली ?



केतकीच्या बनामध्यें
नाग झुलून राहिला . . .
आश्विनी पुनवेला
महिना सहावा लागला.

## तूं नाहि मला पाहिलें

मी माझी शोभा घेउन आलें
तूं नाहि मला पाहिलें !

पिंजऱ्यांतले हुकुमी पक्षी,
वनराजीची व्याकुळ नक्षी,
याच राहिल्या माझ्या साक्षी . . .

तूं नाहिं मला हटकलें . . .
तूं नाहि मला पाहिलें !

रंभा मी, उर्वशी, मेनका,
क्लीओपात्रा, रूथ, राधिका,
चंद्रा, बकुळा, कानडि मलिका . . .

पण मीच मला भोगिले . . .
तूं नाहि मला पाहिले !

रूप अतां हें गोठून गेलें ;
सूर हे असे काळवंडले ;
हीं किडलीं शब्दांचींहि मुळें . . .

रे मीच मला विसरलें . . .
तूं नाहि मला पाहिलें !

## हिशेब

नाही बोललास तेव्हा,
नाही पाहिलेस जातां ;
पण दयाळा रे, झाला
माझा हिशेब चुकता.

# माझ्या मनच्या मोरा

माझ्या मनच्या मोरा !

दाही वाटा मोकळ्या
तुला मनच्या मोरा !
नाच रे थुईथुई
पसरून पिसारा !

नव्हाळीचा कोवळा
तुला मोत्यांचा चारा,
शीत निर्मळ जळ,
माझ्या मनच्या मोरा !

खुळ्या डोळ्यांमधलें
पाणी विसर जरा ;
नाच रे थुइथुइ
माझ्या मनच्या मोरा !

नाच रे थुइथुइ
पसरून पिसारा ;
दाही वाटा मोकळ्या
भूर उड डोंगरा !
माझ्या मनच्या मोरा !

# मी ही घरांतली

मी ही घरांतली
खुशाल झुरते भरांतली,
अन् ती त्या तिथली
खुशाल झुलते मनांतली

मी ही लग्नाची
कधीच झालें विघ्नाची,
अन् ती परक्याची
बात पचविते चरक्याची.

मी ही चंद्रमुखी
तोंड लपवितें सुखासुखी,
अन् ती अवसेची
कुब्जा मिरवी हौसेची.

मी ही रतिमंजरी
मोकळि झुरते या पंजरिं,
अन् ती ऋतुवंत
माझा चळवी गुणवंत.

# सहस्राक्ष

संकोचानें, बेपर्वाईनें किंवा आणि कशानें
   मंडळींत तूं नेहमी मजकडे पाठ फिरविसी बघतें.
परंतु दुष्टा, रंध्रारंध्रांतुन निपटिसि टिपसी मजला . . .
   सहस्राक्ष तूं. . . अन् मीही पापिण जळतें, जळतें, जळतें.

# सासुरवासिण

जा पुसा जाउनी कुणी कुटिल मोहना,
रे उगाच दुष्टा, छळिसी कां तूं गरतींना ?

मी परवां होत्यें बदलित साडी जाउन नुकतिच देवाला
जरा वाकतां अलगद वरतीं खडा नेमका तों आला.
कुणि मूर्त सांवळी होती खालीं, शब्दहि कसला हळुच दिला.
सासुरवासिण खरें सांगतें मी नाहि मुळीं आयकिला . . .

पण तेव्हांपासुन कांहि रुचेना, करमेना.

मी काल सकाळीं पाण्या गेलें, सोबतिला नणदा जावा ;
भर उन्हाची मागें उरलें... हा हाय, साधिला दावा!
ती मूर्त सांवळी वाटेवरती, ओंठावर टेकुन पांवा...
आण गळ्याची खरें सांगतें मज नव्हता कळला कावा.
पण तेव्हापासुन कांहि रुचेना, करमेना.

मी आज अशी ही घरीं एकटी अगतिक कातरवेळेला ;
दिवाहि नुकता शेजीने तुळशीला होता दाखविला ;
ती मूर्त सांवळी संकट घाली, आली, भिडली अंगाला,
आणि विचारी, 'चंद्रावळि गे, कुठे कावळा तुज शिवला?'
मज तेव्हापासुन कांहि सुचेना, समजेना.

# दोनच दिवसांनी

दोनच दिवसांनी का अगदीं
काम तसें बुडणार?
फराळास तरि देइन म्हणतें . . .
उद्यांच तर न्हाणार!

## पाहिलेंस तूं

पाहिलेस तूं आणि वाटलें
चुकलें कोठे कांही.
पाहिलेंस तूं . . . झालें नवखी
भरल्या संसारींही.

पाहिलेस तूं आणि उजळलें
नव्हतें जें स्वप्नींही.
पाहिलेंस जें अजाण पांथा,
पाहिलेंस तूं नाही.

# अवचित

मी अवचित जर का समोर तुझिया आलें
आठवेल का रे तेव्हाचें तें सगळें ?
मी अवचित जर का पुन्हा तुजला दिसलें
सांगशील का रे अखेरचें तें पहिलें ?
मी अवचित जर का हृदयाशीं तुज धरिलें
राहशील का रे तसाच मिटुनी डोळे ?
मी अवचित जर का समोर तुझिया आलें
विसरशील का रे तेव्हाचें तें सगळें ?

## मागुनी प्रेम तुझें घ्यावें

आणि जरि सारे
सारे कोमजती
गुलाबहि हिमजर्जर रातीं,

एक नच कधिही
कधिही कोमजतो
तुझ्या जो ओठांवर विकसतो.

एक मजसाठी
— साठि सदा फुलतो,
दैन्यहर सुदिनवचन देतो.

नयन हे तेथे
तेथे शमवावे,
मागुनी प्रेम तुझें घ्यावें.

## जरा कुठे . . .

जरा कुठे, जरा कुठे
डोळा लागलासें वाटे —
अर्ध्या उमलत्या जगीं
मन खेळवी चोरटें . . .

जणु तूंच, जणु तूंच
आणि तुझें हितगुज —
वळचणींत घराच्या
पाखरांची कुजबुज.

निथळली, निथळली
तुझ्या स्पर्शाची नव्हाळी —
        जाळींतून खिडकीच्या
पखरण चांद घाली.

हुबेहुब, हुबेहुब
तुझ्या श्वासाचीच ऊब —
        लोंबी हुंगीत हा वारा
मळ्यावरून ये लांब . . .

जरा कुठे, जरा कुठे
डोळा लागलासें वाटे —
        अर्ध्या मिटलेल्या जगीं
मन खेळवी चोरटें.

# पाहून मला तूं

पाहून मला तूं केलेंस पाहिलें नाहि जणूं ;  
तें बाळ कुणीतरि उचलुन लगबग  
        चुंबिलेंस भरभर . . .  
विसरूनच सारें जणू.

## साज तुझा

साज तुझा हा असला सुंदर;
आहेही पण कुछ कुछ अंदर!
जा, जा येथे घोटाळुं नको;
मी हा असला जून कलंदर!

# जाशिल त्याला जैं सामोरी

जाशिल त्याला जैं सामोरी
घेउन जा तूं सारी आग ;
त्या आगींतच जळून फुलुं दे
त्याच्या हृदयांतिल अनुराग.

जाशिल त्याला जैं सामोरी
नकोस योजूं कांहिच वांया ;
घेउन जा तूं नुसती आग
घेउन जा तूं नुसती काया.

नकोस वठवूं बेत ठाकठिक,
नकोस बोलूं कांहिच वेडं ;
आगीलाही आगच लाविल
प्रेम असें हें त्याचें करडें.

## पागल

सरळ कधी ना बोललीस तूं ;
मनांतलेंही कळलें ना.
झाले गेलें आठवून पण
आजहि पागल रडतों ना !

## देहली

वाटले बोलावलेंस
आणि मीहि आलों,
अजाण देहलीवर
जरा घोटाळलों.

लावलें जें हृदयाशीं
एवढाच गुन्हा —
डोकावले स्वप्न एक
आवर्जून पुन्हा.

मुखर मनाचे बोल

ओठंगले मुखीं ;

मोहरून आला जीव

आणि एकाएकीं.

अशेषाचे अवशेष

कोसळले उरीं ;

लागले सहज सूर

आणि एकसरीं.

जुळणेंहि नाही कधी

नातें जें आपुलें

आपोआप अवचित

पटलें, फिटलें.

## स्मृति

विसरलीहि असशिल जर तूं
तेव्हा जे घडलें कांही,
हालाहल धुंद जगाचें
मी पचविन बेलाशकही.

आठवून असशिल पण तूं
जर झुरत पुन्हा तेथेंही,
घेतांना श्रमतिल वृत्ती
सुख साधें नेहमीचेंही.

# वंचित

वचन दिलें तें नाहि पाळलें
    म्हणतिल कोणी ... हाय, म्हणोत.
खरें परंतु तुलाच ठाउक
दोघेहि कसे आपण वंचित.

## आपण दोघे

माझाच नव्हे मी तूं नसतांना ;
नव्हे तोच मी तूं असतांही.
मी कोण कोण तूं कसें कळावें ?
आपण दोघे दोघे नाही.

## इमान

मनांतले ते तसे राहिलें;
मनांत नव्हतें सजवुन नेले . . .
तुझाच मी जरि उरलों बाकी,
सावध जीवन इमान राखी.

# आठवण

नेहमीच्या धांदलींत
नाही तुझी आठवण ;
नेहमीच्या धांदलींत
जातों सारें विसरून.

पण कधी तरी असा
जातों पुरा वेडावुन ;
जातों सारें विसरून
एक तुझ्याचवांचून . . .

डोळे निळेशार जेथे
　　दैव अचूक भेटलें ;
ओठ लहाने सोशिक
　　जेथे गुज रेंगाळलें ;

भुज शीत समंजस
　　जेथे शिर विसावलें ;
वक्ष फुंद हिमगौर
　　जेथे मुख हुंदडलें . . .

नेहमीच्या धांदलींत
　　नाही तुझी आठवण ;
पण कधी तरी असें
　　येई सारें भडकून.

# दूर

दूर तुझ्यापासुन मी येथे;<br>
तो ओसरला उत्संखळ पूर . . .<br>
दूर तुझ्यापासुन गे जातां,<br>
मी झालों माझ्यापासुन दूर.

## तुझे आंसू

तुझे आंसू
माझे आंसू . . .
ये ग, फसूं
आणि हसूं.

## त्या तिथे, पलिकडे, तिकडे

नेहमीच शोभुन दिसला
पोशाख तुला जो काळा
लेवून तुझा तो गडे,
असशीलहि का तूं पुन्हा
त्या तिथे, पलिकडे, तिकडे ?

ठाऊकहि ज्यांना सगळें
ते निळे टपोरे डोळे
लावून दूर मजकडे,
असशीलहि का तूं तशी
त्या तिथे, पलिकडे, तिकडे ?

भुइकमळांचे तव हात,
येतांच जवळ मी आर्त,
पसरून तसे ते पुढे,
असशीलहि का तूं उभी
त्या तिथे, पलिकडे, तिकडे ?

चिरवंचित हृदयापाशीं
ठेवून फुलें तीं बाशीं,
विसरूनहि हांसू, रडें,
असशीलहि का तूं पुन्हा
त्या तिथे, पलिकडे, तिकडे ?

## पण मी विसरावें . . .

जनसंमर्दी उगी असावें ;
दुरूनहा तूं मज हेरावें ;
बोलल्याविना मन उघडावें ;
स्पर्शल्याविना पुलकित व्हावें.

वनांत तूं मज खुणवुन न्यावें ;
आपण होउन सारें द्यावें ;
गळ्यांत घालून गळा बसावें ;
जगांत दुसरें कांहिं नसावें.

चित्रकथेला मिळून जावें ;
प्रेम कुणाचें गाढ पहावें ;
आवळून तूं हात धरावें ;
रडतां रडतां आणि हंसावें.

शिष्य तुझा मी तूं शिकवावें ;
मला न कांही तें समजावें ;
पायांपाशीं तुझ्या बसावें ;
मांडीवरतीं मुख लिंपावें.

दुखणाइत तूं मज कळवावें ;
खोलीवर मी धांवुन यावें ;
काळोखांतच तसें बसावें ;
काळालाही तूं फसवावें . . .

काळालाही तूं फसवावें ;
सारें हें पण मी विसरावें . . .

# मैना गेली उडून

[ छंद : गद्योच्चारी ]

चार दिवस आज झाले
मैना गेली उडून
आणि नाही कुणाचं
कांही राहिलं अडून.

शेतमळा नव्हाळीचा
दाणा घेईल टिपून ;
आडावरचं राड पाणी
घेइल तेंही जपून.

राई आहे माळाखालीं
राहिल तिथं लपून ;
गवतकाडी वेचून आणून
घर धरील खपून.

सुलभ तिचं गाणंवाणं
येइल वाऱ्यावरून ;
होइल कांहीतरी आणि
येतील डोळे भरून.

जग माझं छोटंसं ;
मी हा राहिलों अडून.
चार दिवस चोर झालों ;
मैना गेली उडून.

# चेटकीण तूं

ओटांवरचें हांसूं कातिल
सहजहि गेलें छेदुन हें दिल;
खुशाल सांडिसि त्यावर आणि
डोळ्यांमधलें नमकिन पाणी.
कोण कोठली बेपर्वा तूं ?
कोण कोठली चेटकीण तूं ?

नव्हतें जेव्हा तुला पाहिलें
जिकडे तिकडे तुला पाहिलें.

आज अशी ही पण तूं येतां
कुठे तुला मी शोधूं आतां?

लपवूं कोठे तुझेच हेतू?
आदिमाय तूं . . . चेटकीण तूं!

चिरविरही मी तुला धुंडिलें;
जन्मोजन्मीं तुला शोधिलें.

चिरविरही मी तुझ्याचसाठी
आज पुन्हा हा झालों हिंपुटि,

कसें तुला गे सांगुं परंतू?
चेटकीण तूं . . . चेटकीण तूं!

## उध्वस्त करुन . . .

उध्वस्त करुन ती जीवन वदली,
"प्रेमाची तुज रीत न कळली."

# आलीस

[ मुक्तछंद : मानवता ]

आलिस

पाहिलंस,

नाही बोललीस . . .

पण सात जन्मांची पुण्याई

गेलीस

घेउन ओलीस.

## पुनर्भेट

[ मुक्तछंद : प्रेमजीवन ]

आधीच तुझे मोठाले डोळे
ढगाळलेले आज हे पुन्हा
मोठेच दिसती केवढे तरी ;
सुरकुतलेले चिमके ओठ ;
गालहि कसे सुकून गेलेले ;
हातहि थोडेसे लांबच दिसती
वाळल्यामुळें ;
आणि ही किती उठून दिसते
कंठावरची निळी हिरवी
लहानशी शीर . . .
दिसतेस किती निराळीच तूं !

खरेंच नाही पहिल्याने तुला
ओळखलें मी.

नाही कसें पण म्हणूं उगाच ?
बदल नाहींच तुझ्यांत झाला.
बदललें जग.
बदलून गेले शब्दांचे अर्थ.
होऊन गेले एकदां जें कांही
एकदांच कांही होऊन गेलें.
बदललों मीहि.
तूंच एकटी आहेस जशी
होतीस तशी.
बदल कोठून तुझ्यांत व्हावा ?

नव्हतीस कधी तुझीच तूंच.
अवकाश सारें भरून राहिलें

तुझ्या डोळ्यांत ;
ओठांवर तुझ्या टेकल्या निळ्या
डोंगराच्या कडा ;
लांबच लांब नांगरलेल्या
जमिनी तुझ्या गालांवरती ;
आणि वाहतें उन्हाळ्यांतलें
हटवादी पाणी संथपणें तुझ्या
नसांमधून . . .
छंदच घेतला साऱ्यांनी तुझा !
बदलशील कशी मग तूं
उरलीस तूंच नाहीच जेथे ?

ध्यास तुझा जो कधी घेतला
सफल संपूर्ण अशी ही त्याची
आज कहाणी.

## पहिली भेट

आठवते ती पहिली भेट . . .
ओठांवर क्षण कांहि तरळलें,
हातहि जुळले नाही जुळले,
आठवते ती पहिली भेट.

प्रवास धूसर साधा वेष ;
डोळे भोळे गोंधळलेले ;
गोजिरवाणें मुख सुकलेलें ;
विस्कटलेले लाघवि केश . . .

आठवते ती पहिली भेट . . .
धीट पांखरूं घरटें सोडुन
ऊब आपुली आलें घेऊन . . .
आठवते ती पहिली भेट.

# गेलिस दूर

आणि अचानक गेलिस दूर.
कां, कोठें, कांहिच कळलें नाही . . .
सदाच होता लहरी नूर.

रडलों चिडलों माझा मीच.
कां तेंही पुरतें कळलें नाही . . .
रीत अशी ही प्रेमाचीच.

सहजहि आतां आलिस तूंच.
जरि अदये, सगळें कळलें, कळले,
उरलों नाहीं माझा मीच.

## आणि अपेक्षित . . .

आणि अपेक्षित भुतासारखी
वाटेंत उभी अनपेक्षित तूं ;
वेषहि कांही भडक आगळा . . .
दिलीस ओळख सहज परंतू.
सहज म्हणालिस, "चल, ये भाऊ,
इथून सटकूं, कांही खाऊं ;
फसवायाचें स्वतःलाच जर
पुरेपूर चल दोघे फसवूं."

# ही आहे अगदीं साधीशीच कहाणी

ही आहे अगदीं साधीशीच कहाणी
जी सांगायाचे टाळित होतों अजुनी.
जी ऐकुन किंचित् — ऐकिलीत जर पुरती —
हंसल्यागत खांदे उडवुन पहाल वरती.
तो किंवा अगदीं भाव दाखवुनि भोळा
कीं म्हणाल, नाहीं अर्थच कांही कळला !
        कां त्याने तसला छंद घेतला भलता,
        अन् डोळ्यांत तिच्या नाहि विसरला रस्ता ?

कां त्यांची जेव्हा गांठ जाहली पहिली
बोटांतच बोटें तशींच राहुन गेलीं ?
अन् पत्र तिने जें होतें लिहिलें पहिलें
कां त्यांत उषेचे रंग थबकले ओले ?
कां आधी त्याने भाळ तिचें चुंबियलें,
अन् बोटच नुसतें ओठांवर फिरवियलें ?
कां हात अशिक्षित वक्षास्तव तो त्याचा
धडपडतां, टांका तुटला कांचोळीचा ?

> अन् वचन देउनी विसरूनहि जी गेली
> कां तिचा भरवंसा धरुनी प्रीती तगली ?

कां मनांत नसतां आली धांवुन पुन्हा,
अन् तोहि भाबडा खुलला, भुलला पुन्हा ?
ती राईमधली भेट कशास्तव होती ?
कां अंधारांतच धीट होतसे प्रीती ?
कां खरेंच होतें हृदय तिचें उजविकडे,
जें चांचपुनीही नाहि गवसलें तिकडे ?

कां ओठ तिने ते घट्ट दाबुनी धरिले,
जे चुंबचुंबुनी तोंड तयाचें सुकले ?
' त्या पुष्ट किती तव ', वदला कां तो आणि
मापून वितींनी तिच्या पोटऱ्या दोन्ही ?
कां एकाएकी गंभीरच ती झाली,
कांही न बोलतां तशीच उठुनी बसली ?

कां तिथे हिरवळीवरती जें जें घडले
आजवरी त्याचें कोडें नच उलगडलें ?

कां पत्र तिने तें नंतर तसलें लिहिलें,
जें पुरतें त्याने नाहि कधी वाचियलें ?
जे पुरतें त्याला नाहि कधी वाचवलें
रात्रींतच एका दैव जयाचें फिरलें . . .
कां उभा पांहटे तिच्या देहलीवरती
तो अठ्ठाविस की युगें राहिला जास्ती ?

अन् दार उघडुनी आंत तयाला घेतां,
ती काय म्हणाली . . . कशास पण तें आतां ?

तें ढोंगच होतें दुखण्याचें का नंतर ?
का पश्चात्तापें होतें धुतलें अंतर ?
'मी इथे अशी ही शरपंजरिं पडलेली' . . .
अन् तिथेच होत्या दोन संपल्या ओळी.
कां धांवुन आला हूलच होती जर ती ?
कां धांवुन आला भूलच होती जर ती ?
तो तिच्या उशाशीं, बाजेवर ती स्वस्थ ;
अन् दुलईखालीं तिने दाबिला हस्त !
कां वक्षांत तिच्या खुपसुन डोकें त्याने . . .
कां त्याने नाही . . . तिने नाहि . . . कां त्याने . . .

हीं आहे अगदीं साधीशीच कहाणी,
पण अजुनी माझी स्फुरती तींतुन गाणीं.

# क्षण पुढचा

क्षण पुढचा पुढचा मला सेवुं द्या . . .
जीवन सारे खुशाल तुम्ही घ्या.

# स्वप्नांतुन आलिस

स्वप्नांतुन आलिस तुडवित हिमलहरी
तूं तेजशलाका उधळित गिरिकुहरीं.

हें असें कांहिसें घटकेपूर्वी
कुजबुजुनी गेला वायु लाघवी
जें कळलें नाही कण कण झरतां
काळोखाच्या सरी.

ती झाडांवरची अस्फुट कुरबुर ;
पाणोठ्यापाशीं हेकट किर्रकिर . . .
ती गवतांमधली सळसळ अस्थिर
अन् एकाकी हृदयांतिल हुरहुर . . .
मागोवा त्यांचा घेउन आलिस
काळोखाच्या घरीं.

अन् आतां स्मरतें अवकाशांतुनि
या क्षीण तारका तेज गाळुनी
ग सांगत होत्या मूकपणानें
असेंच कांहीतरी.

## सहाजण सजण

सहाजण सजण ऽ
ही भुलवित, झुलवित अजुन ऽ

कधि वसंत उधळित ये उल्लास्
कधि ग्रीष्म भडकतो — अधीर खास्

कधि वर्षा घाली मंगल न्हाण्
कधि शारद किमया फुलवी प्राण्

हेमंत रुसुनि घेई संन्यास्
कधि शिशिर ढाळितो हिम–कुसुमांस्

सहाजण सजण ऽ
ही भुलवित, झुलवित अजुन ऽ

# माळा

मी नक्षत्रांच्या माळा केल्या ;

नरमुंडांच्या माळा केल्या.

# मी मृत्यु पाहिला

मी मृत्यु पाहिला ;
जो नकळत नटला
फुलांफुलांवर,
विश्वस्त उषेच्या निःश्वसितांतहि
जो कुशल विलसला.
मी मृत्यु पाहिला.

मी मृत्यु पाहिला ;
जो गर्जत आला
धुंद वायुसम,
उध्वस्त धरेच्या धुमाळीतुनी
जो जटिल विहसला.
मी मृत्यु पाहिला.

मी मृत्यु पाहिला ;
जो सहज बोलला
जनहृदयांतुन —
        विकटही कांहिसें — अदय हाय, पण
                जो मला विसरला !
                मी मृत्यु पाहिला.

मी मृत्यु पाहिला ;
पण आज पाहिला
अकारण कुणी
        उजळाया कातर जीवन उरलें
                जो धांवुन आला.
                मी सखा पाहिला.

# ओळख

उभ्या जगाचीं मी दुःखें
तुझ्या डोळ्यांत पाहिलीं
आणि अवचित मला
माझी ओळख पटली.

माझी ओळख पटली
मला नव्या बंधनांत ;
परवशतेचें सुख
जाणवलें जाणीवेंत.

जाणीवेंत त्या दयाळा,
तुझ्या डोळ्यांत पाहिला
उभ्या जगाचा आनंद,
उभ्या जगाचा जिव्हाळा.

# जारिणी

साहस मोठें तुझे जारिणी !
कळिकाळाची नाचण होउन,
कुसुमित काया अपुली घेउन,
आलिस वेळिंच अवेळ साधुन.
साहस मोठें तुझें जारिणी !

साहस मोठें तुझें जारिणी !
हरिखुन विलसत आलिस धांवुन.
अव्यभिचारी तूंच पुजारिण . . .
आज पुरा मी झालों अनृण.
साहस मोठें तुझें तारिणी !
साहस मोठें तुझें जारिणी !

# कुणि राक्षस

कुणि राक्षस माझ्या मनी गर्जला,
"नवीन सत्यें दाविन तुजला."

## गोफ

समज सैलसा कमरेंत तुझ्या
गोफच नुसता निळा रेशमी . . .
स्वर्गच फसवा कमरेवरचा
अटळ खालची गणिन धरा मी.

— स्वर्गच फसवा अथांग वरचा
जेथे माझ्या वृत्ती नटती ;
अटळ खालची ऊन धरा ही
जेथे माझ्या वृत्ती फिटती . . .

नकोच तसला पुन्हा वाटे
क्षितिजाचा कटिबंध परंतू ;
स्वर्ग, धरा मज हवी एकदम
चंचल, अविचल एकसंध तूं.

# जिप्सी

आज पुन्हा
पाहिजेच कांही
घट्ट घट्ट धरिलें
हृदयाशीं
जें हाणिल
मथवुनि
डोळे काळे काळे,
कवळिल
निपटित
चपळ चावरीं
उष्ण ओलसर
बोंडें
पिवळीं पवळीं . . .
आज हवी ती
निर्लज्ज दुपार,
निर्बुद्ध हवा,
तो निगरगट्ट कातळ,

कोपरभर चुडा
चोंबडा,
तीं चुटचुटीत
ओशट लोंचट बोटें,
उद्भट जटा,
उभट मोकळ्या
शिंप-शेंदरी काखा,
तो दीर्घपरिघ
अघमर्षण
सोइस्कर घागरा . . .
आज हवी ती
जिप्सी राणक
जी हें
वाचणारही
नाहि कधी
वा-च-त-ही
नाहि कधी
कांहिच
जी.

# गीत

[ मुक्तछंद : प्रेमजीवन ]

वाटलें दूर . . . दूर कुठेतरी
घुमवीन माझें मनांतलें गीत.
आहे माझेंच तें एकुलतें गुज—
लाडकें, हावरें . . . थोडेसें घावरें !

खरेंच नको का
त्यालाहि थोडा मोकळेपणा,
साधनांची जरा अनुकूलता ?
नको का सारें प्रसन्न, साजेसें,
न्यास व्हावया ठसकेबाज ?
कल्पनेचा तो तरल विलास,
चतुराई आणि शब्द-संयम,
स्वर-झंकार —

विशाल हवी पार्श्वभूमीहि —
नको का सारें काव्य-वैभव?
तरीहि वाटलें दूर कुठेतरी
घुमवीन माझें मनातलें गीत.

अडकून पण येथे पडतां
हातघाईच्या जीवनांत, कसा
भावनांचा व्हावा भव्य आविष्कार?
घुमवूं कसें मी मनांतलें गीत.

अभिमान माझा
नाही मी लौकिक गीत गाणारा.
शोधीत हिंडतों ग्रह-गोलांची
गीत-संगति,
क्षुब्ध सागराची प्रचंड गर्जना,

वातचक्राचीं घोर आवर्तनें,
मेघमंडळाचा तमिस्र, धुंद गडगडाट . . .
आणखी कधी
चंद्रकिरणांचा किणकिणाट,
मंद्र सागराचे मर्मर आलाप,
रानवायूची चंचळ शीळ,
वृक्षझऱ्याचें सैल हितगुज . . .
घुमवूं कसें मी मनांतलें गीत ?

अडकून आहे येथे पडलों
अडगळ जेथे माझीच मला,
अनंत पाश घेरती जेथे
भोंवती नेहमी
कोलाहल जसा बलाहकांचा !
घुमवूं कसें मी मनांतलें गीत ?

उमटावें कसें मनांतलें गीत ?
अभिमान माझा मी त्यागी, तटस्थ.
जीवन माझी प्रयोगशाळाच.
जीवन-रस चषक भरून
विश्लेषिले मी — दाखले, सिद्धांत
पट्ट्या मारून आहेत तय्यार ! —
परंतु वाटलें बापुडवाणें
तेहि माझें श्रेय हरपलें आज.
सत्य शोधतां
बोथटली धार अनुभूतीची.
अचेतन सारें सिद्धांतनच !
घुमवूं कसें मी मनांतलें गीत ?

अडकून आहे तसाच पडलों.
अनंत पाश भोंवती तेच.

तक्रार मोठा गलबलाहि
आल्यागेल्यांचा.
घुमलें त्यांतच मनांतलें गीत.

उमटलें माझ्या मनांतलें गीत.
“ यांच्यांतलाच आहे मी एक
सुखवीन यांना गाऊन थोडेंसें ;
सुखावेन मीहि.”

बाळगोपाळांचा बंड आवेश,
नवयौवनांचें फुटीर हास्य,
मळ्यावरची गाण्याची फेर,
नागरजनांचें तसेंच कांहिसें गुणगुणणें,
रसिकजनांच्या मजलसीचा रसिला थाट,
प्रेमिकांचे अर्थविकल कूजन,

अंत:काळचें स्मृतिशोधन, जीवनासक्ति,
— वीतरागयाची अनासक्तीहि —
प्रसूतिकाळचें भयभीत, स्निग्ध, आतुर क्रंदन,
आणि रोजचें काममू जीवन . . .
आहेच त्यांत मी . . . नि:शंक सहज.
विश्व जें माझ्यांत सामावलें नाही
माझ्यांत आहे ते सामावलेले.

# लवलव

[ मुक्तछंद : पद्मावर्तनी ]

घटकाभर तुलाहि भारुन टाकिन,
दाविन
शिथिल मनाच्या गूढ वासना.
अजस्र अजगर ;
गबाळ आळ्या ;
जंगलांतल्या अघोर छाया ;
डबक्यावरच्या शेवाळाचा
हिरवा हिरवा गडद गालिचा ;
संथ तरूंच्या बुंध्याजवळिल
हिरवळ लोचट ;
पिंगट,
ओली, कुजकी, जुनाट पानें ;

भर दिवसाचें अंधारांतिल
अकाल कण्हणें —
ताठर जेथे
मीपण माझें केवळ उरलें . . .

तूं पण असली नवी नवेली.
गात्रे गात्रें रक्तपालवी.
फुलांफुलांवर तुझीच कांती
कोमल खुलली.
वाऱ्याची तर तूंच सहेली.
डोळ्यांत जराशी आणि कुठे ही
नवी धिटाई पराजलेली —
जेथ पराजित चतुरहि माझें
दर्शन होई अकस्मातही . . .
हिमनग घाली मिठी कडाडुन.
मेघ पांगले बिजली डिंवचुन.
टाहो फोडित वारा येई ;
माझें मीपण फेडुन घेई,
नेई . . .

अन् जिकडे-तिकडे

तुझेंच मार्दव लेवुन उठली
लवलव माझ्या मनांतली ही
चहाडबुचरी.

कसें कुणाला सांगूं, दावूं
काय पाहिलें, काय भोगिलें ?
मातीचे मणि कुणी ओविले
नाजुक धाग्यांतुन पाण्याच्या ?
दोन पाकळ्या कशा उमगल्या
दोन पापण्या कशा उघडल्या ?
रसरसलें नवजीवन कोठुन
कडेकपारीं, लव्हाळ्यांतही ?

तेजाचीं कर तूंच नर्तनें,
तूंच शिंपणी,
तुझ्याच मिसळुन जाऊं दे स्वर
नसांनसांतिल ऊन-ऊन या
रक्तांमधुनी.

पुन्हा एकदा
वाऱ्यासंगें अलगद जाऊं ;
अलगद उतरुन गंजीवर त्या
घरंगळतही येऊं खालीं
चाखित, हुंगित ऊन पिसारा,
ऊन निवारा . . .

# मस्तानी

[ मुक्तछंद : पद्मावर्तनी ]

एकापाशीं माती होती.
एकापाशीं मस्ती होती.
एक म्हणाला, ‘ मातीचा मी करीन किल्ला. ’
एक म्हणाला, ‘ मस्तीचा मी चढविन हल्ला. ’
एकापाशीं माती होती, मस्ती होती.
एक म्हणाला, मातीची या मस्तीची अन्
करीन ऐशी मस्तवाल कुणि . . .
छटेल थोडी, हटेल किंचित्,
बनेल किंचित्, मनेल मोठी.
मस्तवाल मी तिच्याचसाठीं
होश्शियार अन् पुन्हा तयार.

यार, तुम्ही त्या दुज्या गांवचे
म्हणुन सांगतों काय म्हणालों, कसें म्हणालो.
उगाच ना तरि चव्हाळ्यावरी
बसाल कांही झोंकित गप्पा
— खवचट तुम्ही टीकाशास्त्री.

माती म्हणजे खरेंच माती ;
दुसरें तिसरें नव्हेच कांही.
काळी, करडी, निळी, तांबडी,
चिकणी, वरडी, भुसभुशीत अन् .
मस्ती म्हणजे माझी, तुमची,
जिवंत साऱ्या मनांमनांची,
युगांयुगांतुन समर्थ ज्यांची
एकच येते हांक निकडिची.

येथ गेलो म्हणाल थोडा
पुन्हा अपुल्या वळणावरतीं
— घसरलाच की बेटा पुन्हा !

मस्ती म्हणजे गालांवरची,

मस्ती म्हणजे डोळ्यांमधली,

मस्ती म्हणजे बाहूंमधली,

मस्ती म्हणजे छाती . . . छाती,

मस्ती म्हणजे मांड्या, मांड्यांवरचा घाम,

मस्ती म्हणजे विसरविणारी,

मस्ती म्हणजे विसरणारिही,

मस्ती म्हणजे मनांतलीं तीं निळीं, जांभळीं,

शुभ्र पांखरें,

मस्ती म्हणजे अफाट माळ,

मस्ती म्हणजे गगनाला जे हात लागती,

मस्ती म्हणजे लाटांवरचा मिस्किल फेस,

मस्ती म्हणजे गंगेमधलें अथांग पाणी,

मस्ती म्हणजे गोपकृष्ण,

मस्ती म्हणजे मत्त हस्ती . . .

अस्तु अतां हें मस्तिपुराण,

जरा दावितों मातीची त्या मस्तीची अन्
मस्तवाल ती . . .
छटेल थोडी, हटेल किंचित्,
बनेल किंचित्, मनेल मोठी,
मस्तवाल मी जिच्याचसाठीं
होशियार अन् पुन्हा तयार.

मातीतुन ती रूपच घेते,
सत्त्व आणखी छाया शीतळ.
केसांत तिच्या काळी माती ;
वक्ष तिचा त्या निळ्या टेंकड्या ;
लाल बरड अन् तिच्याच जांघा ;
जिराइत ती उदरावरची
थोडी करडी, थोडी पिवळी.

माती माझी असली अस्ली.

मस्ती म्हणजे माझा आत्मा

तिच्याभोंवती तेजाचें जो
नवें काढतों वर्तुळ निस्तुळ.

मस्तवाल ती नाचण मोठी
मस्तींतच त्या तोडुन येते नातीं सारीं.
वाऱ्यासंगें स्वयें खेळते
फुगडी, पिंगा आणि झपूर्झा
— नक्षत्रांना घालित डोळा.
भिरभिरते अन् जशी नर्तकी
टोंकावरती एक बुटाच्या
— केवळ पंखच, केवळ डंखच !
गिर्कीतहि त्या कडक झग्याच्या आंखुड
घोळाखालीं सुस्थिर,
मंथर डावा पाय तिचा तो
आगीचा कीं खांबच, कोंभच . . .
आणि संपतां रात्र पहांटे
निळावंतिच्या लाटांवरतीं

तिचीं पावलें तरळत पळतां
नकळत, हलकीं, स्पष्ट, नेटकीं,
मधेंच दावी जिभली काढुन
— चावट साली.
'खेटर माझे अडलें पुन्हा
करायला ही कसरत ऐशी !'

म्हणो कांहिही परंतु येईल . . .
परंतु येइल पुन्हा पुन्हा
पचवायाला अपुलाच गुन्हा.

गस्तवाले होशियार !

# जुनं गाणं

[ पद्य : वैतालिक ]

तिच्या चोंचींत चोंच खुपसुन
मग नंतर तिच्या मानेवरची लव विस्कटून
पुन्हा सारखी कर
आणि किंचित् फडफडावून
छातींत वारा भरून
घुमत रहा.

[ हें मी समोरच्या त्या आळ्यावरच्या कबुतराला सांगतों आहे.

तिचा हात हातांत घेउन
मग नंतर आंगठ्यानं तिच्या तळव्यावरच्या
रेषा चोळून
पुन्हा सारख्या कर

आणि तिच्या मानेवरचं तें वेटोळं किंचित्
वर उचलून
उजव्या कानाच्या पाळीपासून तीन इंचावर
जिथं अगदीं पहिला केस आहे
तिथं एक फुंकर मारून
निःश्वास टाक.

[ हें मी समोरच्या त्या माडीवरच्या नवीनच लग्न झालेल्या
पोराला सांगतों आहे. ]

नुकतीच एक खालून मिरवणूक गेली.
एव्हांना ती उधळलीहि गेली असेल.
परवां त्या तिथं गोळीबारहि झाला.

मोठमोठे बेत आणि मनसुबे रचले जात आहेत.
कुणालाच कशाची शाश्वति वाटत नाही.
माणसं माणसांचीं वैरी झालीं आहेत.
— आणि मी तर सर्वांनाच नकोसा झालों आहे.

पण तुम्हाला त्याची खंत करण्याचं कारण नाही.
हा वाडा जरी जमिनदोस्त झाला
तरी जग कांहीं त्यानं नाहिसं होणार नाही.
जिथं घर आहे — आसरा आहे —
तिथं आसपास दोन तरी कबुतरं घुमत
राहिलेलीं दिसतील
आणि अगदीं मोडक्या, अपुऱ्या जागेंतुनहि
लोहाराच्या भात्याच्या चालीवर

श्वास आणि श्वास यांचं संगीत ऐकूं येईल.

आणि मग त्यावेळीं
माझं हें जुनंच गाणं तुम्हांला अगदीं नवीन
— तुमच्याचसाठी लिहिलेलं — असं वाटेल.

# माझं मन

[ पद्य : वैतालिक ]

माझं मन कसं सुस्थिर बनलं आहे!
मला माझं दुःख कळत नाही,
कारण तें तुमच्या दुःखांत बेमालूम मिसळून गेलेलं असतं.
मला माझं सुख घेरून टाकूं शकत नाही,
कारण तें तुमच्यापाशीच घोंटाळत राहतं.

जीवनाचा स्वाद निःसंकोच घ्यायला हवा . . .
हवा, असं म्हणतात.
पण मला तें शक्य नाही.
त्याच्यासाठीं मन बालकाच्या मनासारखं क्रूर,
स्त्रीच्या मनासारखं एककल्ली,
आणि पुरुषाच्या मनासारखं अगतिक असावं लागतं —

जें अकारण दुसऱ्याला छळील,
जें मुद्दाम दुसऱ्याला खेळवील,
जें वारा येईल तशी पाठ देईल.

माझं मन भिडस्त आहे.
तोलून मापून तें जीवनाचा स्वाद घेतं.
जीवनाच्या सर्व कक्षा व्यापून टाकील इतका संवाद
        ते आणूं पाहतं.
कुलस्त्रीची शालीनता
आणि शास्त्रज्ञाची सम्यक् दृष्टि,
सुजनाचं आत्मौपम्य
आणि रसिकाची सापेक्षता,
यांच्याशी त्याचं अधिक जवळचं नातं आहे.

कधीं तरी उमलणाऱ्या फुलाच्या सर्व छटा

वृक्षाच्या बीजांत आधींच विकसलेल्या असतात.
निसर्गाचा कारभार हा असा तालबद्ध असतो.
त्याची उधळण कितीहि अमाप असली
तरी त्यांतहि एक हातचा राखून ठेवलेला असतो.
त्याने कितीहि भीषण परावृत्ति दाखविली
तरी त्यांतहि एक आशेचा अंकुर असतो.
त्याच तालावर मी पदन्यास करतों.
त्याच तालावर मी जगतों.

आणि म्हणूनच
माझं सुख मला घेरून टाकूं शकत नाही ;
माझं दु:ख मला जखडून टाकूं शकत नाही,
माझं मन असं सुस्थिर बनलं आहे.

# मला काय हवें आहे

[पद्य: वैतालिक]

इकडून या खिडकींतून
मी बाहेरच्या जगाकडे एक दृष्टि लावतों
आणि दुसरी
माझ्या हृदयाच्या गाभ्यावर ठेवतों.
मला सारें कांही दिसतें ;
जें नको आहे तें आणि जें हवें आहे तेंहि . . .
खरेंच मला काय हवें आहे ?
तुम्हाला जें हवें आहे तेंच मला हवें आहे ;
तुम्हाला जें नको आहे तें मलाहि नको आहे.
पण माझ्या दृष्टीची झेंप वेगळी आहे.
माझी भूक मोठी आहे.

माझ्या वेगळेपणाचा मी कधीच अभिमान
धरला नाही.

हे संसारी स्त्रिये, मी तुझ्या अन्नवस्त्राची
        तरतूद केली आहे.
मुलांनो, तुमची सेवा करायला मी सदैव तत्पर आहे.
माझ्या धन्याचा मी कधीच उपमर्द केला नाही.
राज्यरक्षकांचे हुकूम मी जागरूकपणें पाळले आहेत.
माझे हितसंबंध,
माझ्या आशा-आकांक्षा
तुमच्याशीं इतक्या निगडित झाल्या आहेत की
माझी त्यांतून सुटका नाही.
अशी सुटका करून घेण्याची माझी इच्छाहि नाही.
मला याहूनहि अधिक बंधनें हवीं आहेत.

जीवन पाण्यासारखें प्रवाही व्हायला हवे.
ठायीं ठायीं,

कोनाकोपऱ्यांत,

अगदीं अंतरंगांत,

खालच्या थरापर्यंत जाऊन तें पोंचलें पाहिजे.

हा हव्यास, हा विनय, हा अनुनय मला हवा
 आहे.

माती कधी कलंकित झाली आहे काय ?

कोणत्याहि स्वरूपांत तिनें तुम्हांला जगविलें नाही काय ?

तिचा आधार तुम्हांला कधी नकोसा झाला
 आहे काय ?

म्हणून मलाहि मातीमय — मृण्मय — झालें
 पाहिजे.

तिचा विश्वास, तिची शक्ति, तिची भक्ति

हीं सारीं आत्मसात् केली पाहिजेत.

मी माणूसच आहे आणि माणूसच रहाणार —
पण तो वेगळ्या अर्थाने.
माझ्या हृदयांतील जखम सांधायला मी तुम्हांला
सांगणार नाही ;
पण तुमच्यासाठी मात्र मी असेन तेथून धांवत
येईन.
माझा आनंद मी माझ्यापाशीं राखून ठेवणार नाही ;
तो तुम्हालाच देईन.
तो जसा माझा आहे तसाच तुमचाहि आहे.
माझ्या मनाच्या यातना या जर तुमच्याहि
मनाच्या यातना असल्या तरच
मी त्यांना वाचा फोडीन.

तुमचे क्लेश हे माझे क्लेश झाले पाहिजेत ;
कारण मला माझें अस्तित्व टिकवायचें नाही.
मला तुमच्यामध्यें माझ्यासारखें जगायचें आहे.
तुमचे क्लेश, तुमच्या यातना, तुमच्या कामना
मला समजून घेतल्या पाहिजेत.

मला सारें कांही हवें आहे.
मी कशाचाच अव्हेर करूं इच्छित नाही.
मला जीवनाची, जीवनांतील आनंदाची
भीति वाटतां कामा नये.
हे कष्टाराध्ये सत्यभामे, मला तूं हवी आहेस.
दीर्घतप उमे, मला तूं हवी आहेस.
हे संहतोरु पांचालि, मला तूं हवी आहेस.
रक्तलांच्छितपदे उर्वशि, मला तूंहि हवी आहेस.

मला तुम्ही साऱ्याजणी हव्या आहांत.
तुमच्या अंगप्रत्यंगांत, प्रत्येक वृत्तीत आणि
तृप्तींत
माझा आनंद भरलेला आहे.
तुमच्यापाशीं मी माझा कधींच राहणार नाहीं

मला विचारांची भीति वाटतां कामा नये
नव्याजुन्याचा — कशाचाच — मी आग्रह
धरतां कामा नये.
आहे तें मी पारखून घेईन.
तुमचें बोलणें समजून घेईन.
तुमच्या अडचणींवर तोड काढीन.
तुम्हांला नवीन दिशा दाखवीन.
तुम्हांला अगदीं बदलून टाकीन.

तुमच्यापाशी मी तुमचा म्हणूनच राहीन.
इतके मी नवीन विचार आत्मसात्
केले पाहिजेत.

मला माणसांची भीति वाटतां कामा नये.
माणसांची भीति म्हणजे माझीच भीति.
मी मलाच भ्यावें इतका मी भेकड, अधम
आणि विश्वासघातकी आहे काय ?
माझा पिंड पराक्रमावर, कारुण्यशीलतेवर
आणि समजूतदारपणावर पोसलेला आहे.
मी सर्वांचाच विश्वास संपादन केला पाहिजे.

इकडून या खिडकीतून
मी बाहेरच्या जगाकडे एक दृष्टि लावतों ;

आणि दुसरी

माझ्या हृदयाच्या गाभ्यावर ठेवतों.

मला सारें कांही दिसतें ;

जें नको आहे तें आणि जें हवें आहे तेंहि . . .

खरेंच मला काय हवें आहे ?

तुम्हांला जें हवें आहे तेंच मला हवें आहे ;

तुम्हांला जें नको आहे तें मलाहि नको आहे.

पण माझ्या . . . . . .

. . . . . . . . . .

# झाड

एक आहे झाड माझें

रांठ ज्याच्या जीर्ण शाखा ;

साठिषण्मासीं परंतू

लाख येती ज्या शलाका.

झाड माझें लाल ज्याला

आग्रहाचीं लाख पानें ;

आणि माझी बंडखोरी

घोषतों मी गात गाणें.

झाड माझें लाखमोली

लाल ज्याला फक्त पानें,

नेणतां ये एक ज्याला

शुभ्र कांही जीवघेणें —

एक, ज्याला जाणिवेच्या

लांच्छनाच्या गंध-रेखा ;

पाहतों मी ज्यांत माझें

झाड, माझ्या आणभाका.